सन २०२१-२२ मध्ये परिभाषित अंशदान निवृत्तीवेतन योजनेंतर्गत शिक्षक व शिक्षकेतर कर्मचाऱ्यांकरिता अंशदानाच्या रकमा प्रदान करण्याकरिता उर्वरित निधी वितरीत करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः अंनियो- ३४२१/प्र.क्र.४६/टिएनटी - ६**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक, मंत्रालय,
मुंबई ४०० ०३२,
तारीख: २४ मार्च, २०२२

वाचा -

१. शासन निर्णय वित्त विभाग क्र.अंनियो-१००९/प्र.क्र.१/सेवा-४, दि. १२/११/२०१०.
२. शासन निर्णय शालेय शिक्षण व क्रीडा विभाग क्र.अंनियो-१००६/(२३/०६) माशि-२, दि. २९/११/२०१०.
३. शासन निर्णय शालेय शिक्षण व क्रीडा विभाग क्र.संकीर्ण २४१३/(८५/१३)अर्थसंकल्प, दि. १३/०७/२०१७.
४. शासन निर्णय शालेय शिक्षण व क्रीडा विभाग क्र.अंनियो-३४१६/प्र.क्र.८६/१६/टीएनटी-६, दि. २०/१२/२०१७
५. शासन निर्णय शालेय शिक्षण व क्रीडा विभाग क्र.अंनियो- ३४२१/प्र.क्र.४६/टिएनटी -६, दि. २४/०८/२०२१

प्रस्तावना -

जिल्हा परिषदा मान्यताप्राप्त खाजगी अनुदानित प्राथमिक, माध्यमिक, उच्च माध्यमिक व अध्यापक विद्यालयातील १००% अनुदानित पदावरील शिक्षक व शिक्षकेतर कर्मचाऱ्यांसाठी परिभाषित अंशदान निवृत्ती वेतन योजनेची कार्यपध्दती संदर्भ क्र.१ च्या शासन निर्णयान्वये विशद केली आहे. नवीन "परिभाषित अंशदान निवृत्तीवेतन योजनेच्या" अंशदानाच्या रकमा परत करण्याबाबतची कार्यपध्दती संदर्भ क्र. ३ च्या शासन निर्णयान्वये विशद केली आहे. सन २०२१-२२ मध्ये परिभाषित अंशदान निवृत्तीवेतन योजनेंतर्गत शिक्षक व शिक्षकेतर कर्मचाऱ्यांकरिता अंशदानाच्या रकमा प्रदान करण्यासाठी ४०% रक्कम संदर्भ क्र.५ अन्वये वितरीत करण्यात आली आहे. तसेच ८३४२ ०१८६ या लेखाशिर्षाखाली ४०% निधी वितरीत केल्यानंतर वित्त विभागाने ८३% निधी वितरीत केला आहे. आता खालील लेखाशीर्षाखाली अंशदानाच्या रकमा प्रदान करण्याबाबतचा उर्वरित निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय -**

सन २०२१-२२ मध्ये परिभाषित अंशदान निवृत्तीवेतन योजनेंतर्गत शिक्षक व शिक्षकेतर कर्मचाऱ्यांकरिता अंशदानाच्या रकमा प्रदान करण्यासाठी ४०% रक्कम दि.२४/०८/२०२१ अन्वये वितरीत करण्यात आली आहे. सदर एकूण तरतूदतील उर्वरित रक्कम एकूण रू.२,०५,९१,१५६ /-(रुपये दोन कोटी पाच लाख एक्याण्णव हजार एकशे छप्पन्न फक्त) इतका निधी अर्थसंकल्पीय वितरण प्रणाली (BEAMS) द्वारे खालील विवरणपत्रानुसार वितरीत करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

(रुपये हजारात)

| अ क्र | योजनेचे नाव व लेखाशिर्ष | सन २०२१-२२ मध्ये अर्थसंकल्पित निधी | शासनाकडून वितरीत झालेली तरतूद आणि टक्केवारी | | प्रस्तावित निधी सन २०२१-२२ |
|---|---|---|---|---|---|
| | DCPS रकमा परत करावयाचे लेखाशीर्ष | | टक्केवारी | तरतूद | |
| १) | ८३४२ इतर ठेवी, ११७ शासकीय कर्मचाऱ्यांकरिता परिभाषित अंशदान निवृत्ती वेतन योजना, (०४)(०७) मान्यताप्राप्त व अनुदानित प्राथमिक शाळेतील शिक्षक व शिक्षकेतर कर्मचारी यांना परिभाषित अंशदान निवृत्तीवेतन योजनेंतर्गत परतावा, (८३४२ ०१७७) | १,००,०० | ४०% | ४०,०० | ६०,०० |

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| २) | ८३४२ इतर ठेवी, ११७ शासकीय कर्मचाऱ्यांकरिता परिभाषित अंशदान निवृत्ती वेतन योजना, (०४)(०८) मान्यताप्राप्त व अनुदानित माध्यमिक व उच्च माध्यमिक शाळेतील शिक्षक व शिक्षकेतर कर्मचारी यांना परिभाषित अंशदान निवृत्तीवेतन योजनेंतर्गत परतावा (८३४२ ०१८६) | ८,५८,३७ | ८३% | ७,१२,४५.८४४ | १,४५,९१.१५६ |
| | **एकूण** | ९,५८,३७ | | ७,५२,४५.८४४ | २,०५,९१.१५६ |

२. सदर खर्च सन २०२१-२२ या आर्थिक वर्षात अर्थसंकल्पीत करण्यात आलेल्या संबंधित लेखाशीर्षाच्या तरतूदीतून भागवावा, तसेच मंजूर अनुदानापेक्षा जास्त खर्च होणार नाही, याची दक्षता घ्यावी.

३. या शासन निर्णयात मंजूर केलेली अनुदाने संदर्भ क्र.१ व ३ येथील शासन निर्णयातील अटी व शर्तीच्या अधीन आहेत. उपलब्ध करुन देण्यात येत असलेल्या निधीचे उपयोगिता प्रमाणपत्र शासनास सादर करण्यात यावे.

४. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या सहमतीने व अनौपचारिक संदर्भ क्र.२७१/२०२२/व्यय ५, दिनांक ०२/०३/२०२२, व शासन निर्णय क्र.अंनियो-१००६/(२३/०६) माशि-२, दिनांक २९/११/२०१० व शासन निर्णय क्र.अंनियो-३४१६/ प्र.क्र.८६/ १६/ एनटी-६, दिनांक २०/१२/२०१७ मधील अटी व शर्तीच्या अधीन राहून निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२२०३२४१८१८०१८१२१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Digitally signed by Sameer Anant Sawant
Date: 2022.03.24 18:19:26 +05'30'

**( समीर सावंत )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा. राज्यपालांचे सचिव
२. मा. सभापती, महाराष्ट्र विधानपरिषद, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई
३. मा. अध्यक्ष, महाराष्ट्र विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई
४. मा. विरोधी पक्षनेता, महाराष्ट्र विधानसभा / विधानपरिषद, मुंबई
५. मा. उपसभापती, महाराष्ट्र विधानपरिषद, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई
६. मा. उपाध्यक्ष, महाराष्ट्र विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई
७. मा. विधानसभा, विधानपरिषद व संसद सदस्य, महाराष्ट्र राज्य,
८. मा. मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव
९. मा. उपमुख्यमंत्र्यांचे सचिव
१०. मा. मंत्री (शालेय शिक्षण) यांचे स्वीय सहायक
११. मा. राज्यमंत्री (शालेय शिक्षण) यांचे स्वीय सहायक
१२. अप्पर मुख्य सचिव (शालेय शिक्षण व क्रीडा विभाग) यांचे स्वीय सहायक
१३. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र - १ / २, मुंबई / नागपूर
१४. महालेखापाल (लेखा परीक्षा), महाराष्ट्र - १ / २, मुंबई / नागपूर
१५. आयुक्त (शिक्षण), महाराष्ट्र राज्य, पुणे
१६. राज्य प्रकल्प संचालक, महाराष्ट्र प्राथमिक शिक्षण परिषद, चर्नीरोड, मुंबई

१७. सहसचिव / उपसचिव (विद्यार्थी विकास / शाळा व्यवस्थापन / शिक्षक शिक्षकेतर / प्रशासन / समन्वय / अर्थसंकल्प / क्रीडा ) शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई
१८. शिक्षण संचालक (माध्य. व उच्च माध्य. / प्राथमिक / प्रौढ व अल्पसंख्यांक / SCERT / महाराष्ट्र राज्य परीक्षा परिषद) महाराष्ट्र राज्य, पुणे
१९. अध्यक्ष, माध्यमिक व उच्च माध्यमिक शिक्षण मंडळ, महाराष्ट्र राज्य, पुणे
२०. सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी जिल्हा परिषद
२१. संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई
२२. सर्व विभागीय शिक्षण उपसंचालक
२३. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
२४. स्थानिक निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई
२५. वरिष्ठ कोषागार अधिकारी, पुणे
२६. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
२७. सर्व शिक्षणाधिकारी (प्राथमिक / माध्यमिक / प्रौढ)
२८. सर्व अधिक्षक, वेतन पथक (प्राथमिक / माध्यमिक)
२९. वित्त विभाग (व्यय-५ / व्यय-१४ / अर्थसंकल्प - ८) मंत्रालय, मुंबई
३०. सर्व कार्यासने, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई
३१. निवड नस्ती, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई.